जलसंपदा विभागांतर्गत असलेल्या सर्व अधिकारी / कर्मचारी यांचेकरीता ई-सेवा पुस्तक ही प्रणाली राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ई प्रशा-२०१४/(२५१/१४ )/लपा-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११.११.२०१४.

**संदर्भ:-** जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र. संकीर्ण-२०१२/ १०/ संकाक, दि.२६/०४/२०१३.

**प्रस्तावना**

जलसंपदा विभागासाठी “ई-सेवा पुस्तक” ही महाऑनलाईनने विकसित केलेली प्रणाली सर्व क्षेत्रीय कार्यालयामध्ये राबविण्याच्या दृष्टिने कार्यवाही करण्याबाबत उपरोक्त संदर्भान्वये निर्णय घेण्यात आला होता. या अनुषंगाने कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या कार्यालयामध्ये सदर प्रणालीबाबतचा पथदर्शी कार्यक्रम यशस्वीरित्या पार पडला आहे. जलसंपदा विभागातील सर्व अधिकारी / कर्मचारी यांचेसाठी सदर “ई-सेवा प्रणाली” उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, या अनुषंगाने शासन पुढील प्रमाणे आदेश निर्गमित करत आहे-

**शासन निर्णय:-**

जलसंपदा विभागातील सर्व कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांचे सेवा विषयक माहितीकरीता “ई-सेवा पुस्तक” या प्रणालीचा वापर अनिवार्य करण्यात येत आहे. सदर प्रणालीतील उपलब्ध माहितीच्या आधारे शासन स्तरावरील विविध कार्यवाही पार पडणार असून, शासन सदर माहिती अधिकृत मानण्यात येईल. ई-सेवा पुस्तक प्रणाली राबविण्याच्या अनुषंगाने पुढील सुचना देण्यात येत आहेत-

१) सदर प्रणाली ही जलसंपदा विभागाच्या अखत्यारीत असलेल्या सर्व कार्यालयांसाठी राबविण्यात यावी. यामध्ये सर्व महामंडळे/मेरी/वाल्मी/ मुख्य अभियंता (स्थापत्य / विद्युत / यांत्रिकी) आदी कार्यालये आणि त्यांचे अधिनस्त असलेले सर्व कार्यालये यांचेसाठी लागू राहील.

२) सदर प्रणाली दि. ३१ डिसेंबर २०१५ या दिनांकानंतर निवृत्त होणाऱ्या सर्व वर्गातील अथवा सर्व गटातील सर्व प्रकारच्या (स्थायी / अस्थायी / परीविक्षाधीन / रु.अ.आ) अधिकारी / कर्मचारी यांचेकरीता लागू राहील.

३) ई-सेवा पुस्तक वापरण्यासाठी अधिकारी / कर्मचारी यांना लॉगीन आय डी व पासवर्ड देण्यात येईल. त्या आधारे प्रणालीमध्ये माहिती भरणे व ती अचूक असल्याची खातरजमा करणे तसेच प्रणालीचा पासवर्ड सुरक्षित ठेवणे, तो वेळोवेळी बदलणे आदी जबाबदारी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांची राहील.

४) अधिकारी / कर्मचारी यांनी भरलेली माहिती ही संबंधित DDO तसेच कार्यालय प्रमुख यांनी पडताळणी केल्यानंतर गोठविण्यात येईल व त्यात नंतर बदल करता येणार नाही. अशा प्रकारे माहितीची पडताळणी करण्याची कार्यवाही विहित कालवधीमध्ये करणे तसेच त्यांना याकामी दिलेले लॉगीन आय डी व पासवर्ड सुरक्षित ठेवणे व तो वेळोवेळी बदलणे ही जबाबदारी त्यांची राहील.

५) सदर प्रणालीमध्ये विविध प्रकारच्या रजेबाबतच्या नोंदी भरताना दि. १ जानेवारी २०११ नंतरच्याच नोंदी भरण्यात याव्यात. तर प्रशिक्षणाबाबतच्या नोंदी भरताना शासन सेवेमध्ये प्रवेश केल्यापासुन आजतागायतच्या सर्व नोंदी घेण्यात याव्यात.

६) विभागामध्ये नव्याने नियुक्त झालेल्या अधिकारी / कर्मचारी यांचेकरीता नव्याने ई-सेवा पुस्तक तयार करण्यासाठी कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे यांना कळविण्यात यावे.

७) सदर प्रणालीमध्ये ज्या-ज्या अधिकारी / कर्मचारी यांना आहरण व संवितरण अधिकारी यांचे मार्फत वेतन अदा केले जाते त्या सर्वांची माहिती भरणे आवश्यक असून, अशा प्रकारची कार्यवाही त्यांचे मार्फत होणे आवश्यक आहे.

सदर प्रणालीमध्ये संपूर्ण माहिती भरण्याची कार्यवाही विहित कालावधीमध्ये न करणाऱ्या कर्मचाऱ्यांचे वेतन संबंधित कार्यालय प्रमुखांनी जोपर्यंत अशी कार्यवाही पूर्ण होत नाही तोपर्यंत अदा करु नये, अन्यथा त्यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११२१३०२४६२०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2014.11.12 13:12:06 +05'30'

(डॉ. संजय बेलसरे)
शासनाचे उपसचिव

प्रत :

१. खाजगी सचिव, मा. मंत्री,(जलसंपदा),मंत्रालय,मुंबई-३२.
२. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री,(जलसंपदा), मंत्रालय, मुंबई-३२.
३. सर्व मा. विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य.
४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा वि अनुज्ञयता), मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा वि परीक्षा), मुंबई/ नागपूर
६. प्रधान सचिव(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (मा.तं) माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व महासंचालक / कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
१०. सर्व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
११. सर्व उपसचिव, जलसपंदा विभाग मंत्रालय, मुंबई
१२. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१३. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१४. कार्यासन संग्रहार्थ.